**मौजे कमला तांडा तहत जिरगा ता.मुखेड जि.नांदेड या नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पापुयो - २०१८/प्र.क्र.१०८ /पापु १८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०२ जुलै, २०१८

**वाचा -**

१) ग्राम ग्राम पंचायत,जिरगा, ता.मुखेड.जि.नांदेड यांचे मुळ अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यतेचा ठराव क्र. १९, दिनांक १५/८/२०१४

२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नांदेड यांचे मुळ तांत्रिक मान्यता रजिस्टर क्र. , ४०९ दिनांक ४/८/२०१४

३) ग्राम पंचायत,जिरगा, ता.मुखेड, जि.नांदेड यांचे सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यतेचा ठराव क्र. ७ (०२), दिनांक २६/०१/२०१८

४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांचे सुधारीत तांत्रिक मान्यता रजिस्टर क्र. ५९१, दिनांक ८/०२/२०१८.

५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांचे जाक्र.जिपना/पापुवि/२६९१/२०१, दिनांक २२/१२/२०१७

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे कमला तांडा तहत जिरगा ता.मुखेड जि.नांदेड नळ पाणी पुरवठा योजनेस ग्राम पंचायत,जिरगा, ता.मुखेड.जि.नांदेड यांनी संदर्भ क्र.१ येथील ठरावान्वये मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. सदर योजनेच्या रु.२९,८५,२००/-(ढोबळ) किमतीच्या अंदाजपत्रकास कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नांदेड यांनी संदर्भीय क्र.२ अन्वये मुळ तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. सदर योजनेच्या विहीरीच्या कामातील प्रत्यक्ष सिंकींग पध्दतीने करावे लागल्यामुळे, वितरण व्यवस्थेचे कॉंक्रीटचे रस्ते पूर्ववत करण्यासाठीच्या परिमाणात वाढ तसेच वितरण व्यवस्था लांबीत वाढ झाल्यामुळे योजनेच्या खर्चात वाढ झाली आहे. त्यानुसार संदर्भ क्र. ३ अन्वये कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नांदेड यांनी सुधारीत तांत्रिक मंजुरी दिली असून संदर्भ ४ अन्वये ग्राम पंचायत, कमला तांडा तहत जिरगा ता.मुखेड, जि.नांदेड यांनी सुधारीत मान्यता देण्याबाबतचा ठराव संमत केला आहे. त्यानुषंगाने संदर्भ क्र.५ अन्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंजादपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव सादर केला होता. तदनुषंगाने प्रस्तुत योजनेच्या रु. ३४,३२,६००/-(ढोबळ)

किंमतीच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मौजे कमला तांडा तहत जिरगा ता.मुखेड जि.नांदेड या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ३४,३२,६००/- (ढोबळ) (अक्षरी रुपये चौतीस लक्ष बत्तीस हजार सहाशे फक्त) एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे ३ महिन्यात पूर्ण करावीत.
२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, औरंगाबाद यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी व कंत्राटदार यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.
४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.
५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने (संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.
६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.
७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.
८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुर्नसुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

**०२.** या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च रु. ४,४७,४००/-(ढोबळ) (अक्षरी रुपये चार लक्ष सत्तेचाळीस हजार चारशे फक्त) हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

**०३.** प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

**०४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०२१३१८२३९१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Sawairam Rathod

Digitally signed by Suresh Sawairam Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e695ebef4b8a6c860bec48f3ef34f42f0c13f8d1aa06f854d5b9bd6874084124, serialNumber=bcaaf1242528ff3cdece2c8eb03929321c1c09c0a7c4d906e3b8a47677ad9769, cn=Suresh Sawairam Rathod
Date: 2018.07.02 13:20:19 +05'30'

**(सु.स.राठोड)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई.
२) मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५) जिल्हाधिकारी, नांदेउ.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड.
७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
८) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
९) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१०) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद
११) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नांदेड
१२) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१३) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद.
१४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नांदेड.
१५) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१७) कार्यासन (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१३,१७ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
१८) निवडनस्ती कार्यासन पापु-१८.